मित्रहो,

"*जगता जगता राहून गेले जगायचे*" असा सूर अनेकदा अनेकांकडून ऐकायला मिळतो. परंतु कवी मात्र

"*हे जीवन सुंदर आहे*" किंवा "*या जन्मावर; या जगण्यावर शतदा प्रेम करावे*" असेच नेहेमी म्हणत राहतो.

कविचे जगणे कवितांमधुन उलगडत जाते; आणि कवी शब्दांचे अद्भुत पिसारे उलगडतानाच आपल्यालाच आपले जीवनदेखील उलगडवुन दाखवतो. कवीची प्रत्येक कविता हा त्याच्या स्वतःच्या आणि व्यापक अर्थाने पाहिले तर आपल्या सगळयांच्या जीवनाचा देखील शोध असतो.

आजचा आपला हा नेटाक्षरीचा अंक हा असाच काही कवींनी घेतलेला जीवनाचा शोध व्यक्त करत जातो. कुठेतरी जीवनाच्या एखाद्या अंगाला स्पर्श करत, तर कुठे जीवनातलं हरवलेलं अस्सलपण उलगडत, कुठे जीवनालाच जगावं कसं याचं ज्ञान देत, तर कुठे जगण्याला एक नवीन परिमाण देत...

चला तर मग, माझ्यासोबत तुम्हीही या जीवन-प्रवासात सामील व्हा, या अंकातील कवितांमधुन आपल्याला जीवनाचा एखादा कधीच न सापडलेला धागा-दोरा मिळतो का ते शोधु या!

म्हणूनच या अंकाला म्हणु या ....... याला ***"जीवन"*** ऐसे नाव...

हाडाचा (अन सा-या हाडांवर वाढलेल्या मांसाचा देखील) ‘**सोलापूरकर**’!!



आयुष्यात कधी कविता आवडायला लागली सांगता येणार नाही. पण एक प्रसंग आठवतो..

शिक्षक दिनाच्या दिवशी “कणा” ही कविता शिकवताना मी देहभान विसरून शिकवत होतो. पोरं तल्लीन होऊन ऐकत होती, अन जेव्हा भानावर आलो तेव्हा वर्गाच्या दारात, खिडकीजवळ सारे शिक्षक उभे होते अन मी थांबताच टाळ्यांचा कडकडाट झाला. **जास्तीत जास्त प्रामाणिक सांगायचे तर बहुदा त्या टाळ्यांनी वेड लावलं कवितेचं.**

मग पहिलं प्रेम अन पहिली कविता. पहिला प्रेमभंग आणि... अनेक कविता !!

प्रवास सुरू झाला. माझ्याकडुन एक चारोळी लिहिली गेली...

**“तु खोटच ‘हो’ म्हण..**
**मन सातवं आकाश गाठेल..**
**खरेपणाने फ़ार थकलंय आता..**
**खोटेपणात तरी विसावा भेटेल!!”**

अन सा-या (एकतर्फ़ी प्रेमी) लोकांची भरभरून दाद मिळाली.

शिक्षणानंतर पुण्यास आलो. घरची, मित्रांची तातातूट पहिल्यांदा जाणवली. मग स्वतःशी संवाद सुरू झाला. अन कुठल्याशा सुंदर वेळी मी ऑरकुटचा आणि **“मराठी कविता व काव्यांजली”** समुहाचा सभासद झालो. इथे मुख्यतः मी कविता वाचायला शिकलो, अभिप्राय द्यायला शिकलो, रसग्रहण करायला शिकलो. या समुहावर आल्याशिवाय चैन पडेना. व्यसनंच लागलं समुहाचं.

आता आयुष्यात काहीही झालं तरी मी कवितेतुन नीट व्यक्त होतो, किंबहुना मला ते छान जमतं. मग फ़क्त दाद यावी म्हणून लिहायचे बंद झाले. मी व्यक्त होण्यासाठी लिहू लागलो.

श्रीराम लागू यांच्या एका मुलाखतीत वाक्य वाचलं “नाटक हा माझा जीवनाचा मुलाधार आहे”.

अन मला प्रश्न पडला होता की माझ्या जीवनाचा मुलाधार नक्की काय? अन एकदम अंधार!!

**मला कविता मिळाली अन हा प्रश्न सुटला!!!**

अन काय सांगू? **जेवढा आज प्रकाशात आहे तेवढा कवितेमुळे!!!**

निर्मि/[illegible]

# उपजत

काळोख्वातच जन्मा येणे

मातीमध्ये भिजणे रूजणे

न च परि तेथे अडकुन पडणे

सूर्य-दिशेला वाढत जाणे

हे तर मजला उपजत देणे.

असलो जरिहि किती कोवळा

धरतीचा फ़ाडून कोथळा

तेजोनिधिची साद ऐकणे

मार्ग आपुला शोधत जाणे

हे तर मजला उपजत देणे.

जन्म सफ़ल हा होईल तेव्हा

गंध फ़ुलातुन हसेल जेव्हा

धुंद होऊनि गाईन गाणे

फ़ेडुन टाकिन त्याचे देणे

हे तर मजला उपजत देणे.

-

- कै . घनश्याम पोटभरे (अहं ब्रम्हास्मी)

# आयुष्य तसे जगावे....

पानावरील दवबिंदु जसे
आयुष्य तसे जगावे
गळताना सुद्धा
क्षणभर चमकून जावे.

प्रशांत जलधी जसा
आयुष्य तसे जगावे
अंतरात दडले रत्नमोती
तरी गर्वाचे पूर न उचंबळावे.

मेघातील जल जसे
आयुष्य तसे जगावे
एखाद्या चातकाची
क्षुधा शमवूनी जावे.

तुफ़ानातील दीपस्तंभ जसा
आयुष्य तसे जगावे
सारे आघात झेलूनही
कुणास तरी दिशादर्शक व्हावे.

स्वछंद फुलपाखरू जसे
आयुष्य तसे जगावे
दोन दिसांचे जीवन
पण मुक्त बागडावे.

आयुष्य जगायला हवे जसे
आयुष्य तसे जगावे
संपल्यावर सुद्धा
प्रत्येकाच्या लेखणीतुन उतरावे.

पंकज ... तो एक राजहंस

## अर्धा-भरला पेला

तहान कळणे महत्वाचे!
आत्मा भिजणे महत्वाचे!!

तहान लागली असता,
पेला असणे महत्वाचे!

पेला हाती असताना..
तहान असणे महत्वाचे!

अर्धा-भरला पेला उचलूनी,
ओठी लावणे महत्वाचे!

असेल हाती तेवढे जीवन,
थेंब थेंब प्राशणे महत्वाचे!

पेला संपवून खाली ठेवता..
आभार मानणे महत्वाचे!!

- स्वाती फडणीस (मुंबई)

## माझे जगणे

माझे जगणे मुळात नाही माझ्यासाठी
मी उकलाव्या परदुःखाच्या कोमल गाठी

जखमेवरती फुंकर घालुनी प्राण भरावे
आणि कुणाच्या पापणीतले मेघ पुसावे

मी द्यावे आभाळ कोंडलेल्या पंखांना
कुरवाळावे मूक अंतरीच्या डंखांना

दे परमेशा ऊब एवढी ह्या तळहाती
केवळ स्पर्शाने उजळाव्या विझल्या वाती

मी कोणाच्या श्रद्धेसाठी फुलून यावे
आणि शेवटी तुझ्या पावली निर्माल्यावे.

- प्रसन्न शेंबेकर (नागपूर)

# आठोळया

परिघाशी धुंद अणु
केंद्राशी शांत जणू
मन पटले, वलयाशी
दिडदिडते प्राण, तनु.

विलयाशी अंत असे
उगमाशी पंथ दिसे
नियती ह्या चक्रातील
पांथस्थ मी एक मनु.

जगण्यास आलो, जगणेच आहे.
पडता नदीत मला पोहणेच आहे.
कोण म्हणे मला, हा नाही रे प्रवास,
उठले पाऊल पुढे चालणेच आहे.

वेळ येता जैसी, तैसी भिडणे लढणे.
थांबणे ना कधी, नाहीच रडणे.
हार-जीत काय? रोजचाच खेळ!
विश्व परिघात मला, घडणेच आहे.

- भुषण महाजन (पुणे)

# अंत

फुलत्या क्षणी फुलणे ना जमले,
सुकताना ही खंत नको
गंधित होऊन, बहरून जावे,
पाचोळ्यापरि अंत नको.

जगणे अवघड झाले तेव्हा
दिला सुरांनी जन्म नवा,
जन्मांतरि हे सूर भिनावे,
नुसता कोकिळकंठ नको

रंग-रूप-रस-गंध साठवित
फुलाफुलावर लहरावे,
फूलपाखरी जीवन व्हावे,
कोषातील सुरवंट नको

क्षणाक्षणाला कणाकणातुन,
उसळावे चैतन्य अनोखे,
खळाळते आयुष्य असावे,
गती कधिही संथ नको

अद्‌भुत काही असे घडावे,
असणे-नसणे सार्थ ठरावे,
रडतच आलो, रडवुन गेलो
इतका साधा अंत नको.

**- क्रांती सडेकर (नागपुर)**

# माझे जगणे

माझे जगणे मुळात नाही माझ्यासाठी
मी उकलाव्या परदुःखाच्या कोमल गाठी

जखमेवरती फुंकर घालुनी प्राण भरावे
आणि कुणाच्या पापणीतले मेघ पुसावे

मी द्यावे आभाळ कोंडलेल्या पंखांना
कुरवाळावे मूक अंतरीच्या डंखांना

दे परमेशा ऊब एवढी ह्या तळहाती
केवळ स्पर्शाने उजळाव्या विझल्या वाती

मी कोणाच्या श्रद्धेसाठी फुलून यावे
आणि शेवटी तुझ्या पावली निर्माल्यावे.

- प्रसन्न शेंबेकर (नागपूर)

# आत्मशोध

एकदा बाकीचे प्रश्न सोडून, एकच प्रश्न डोक्यात घेत..

कोऽहम कोऽहम करत..

खूप आत जावं..

तिथे आत्मशोध नावाच्या प्रकरणामध्ये..

काही प्रश्न विचारावेत...

निरागस हसणारा तू कुठे गेलास?

आणि काही उपप्रश्न हि विचारावेत..

कि नक्की प्रश्न कशाचा आहे? निरागसतेचा कि हास्याचा?

आणि मग याचीहि खोटी उत्तरं देत,

आत्मशोध संपुर्ण झाला..

असा शेरा मारून..

ते प्रकरण..

कायमचे मिटवून टाकावे आपल्यापुरते...

आणि एका नवीन प्रकरणाला सुरुवात करावी..

विश्वशोध!!

कारण ‘इथे’ खोटेपणा केल्यावर..

‘तिथे’ कुणीच विचारत नाही खरी उत्तरं..!!

## आत्मशोध चालुच राहतो.............

नक्की कधी कळायला लागलं..?
कि चोर-पोलीस खेळात..
पोलिसच चोर असू शकतात..
अन कधी उमगलं आपल्याला
कि बुद्धी वापरून झालं, तर ठीक...
नाहीतर बळाचाच वापर जास्त करता येतो..

अन कधी कळल?
की लग्नात माणसाला माणूस नाही,
जातीला जात लागते...
संसाराला प्रेम नाही,
पैसा लागतो...
पोरांना बाप नाही,
संपती लागते..

आत्मशोध घेताना याची उत्तरं मिळावी..
म्हणजे आत्म्याचा शोध संपुर्ण थांबेल,
आणि आत्मशोध घेताना...
माणुसकी सोडून आपण नक्की कधी ‘असे’ झालो,
या उपप्रश्नांचे एक आवर्तन थांबेल..

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने १००चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

## ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-नियतकालिके

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

**प्रसिद्ध झालेली ई-बुक्स**

- ई-शाळा
- तो, मी आणि सिगरेट
- मोरया
- लोकल गोष्टी
- मीरा अनुवाद
- ऑथंब
- सावळ्या मुलीची गाणी
- सईची  वही

**प्रसिद्ध झालेली ई-बुक्स**

- **टल्लीची शाळा**
- **मकरंदच्या त्रिवेण्या**
- **ग्रेव्हयार्ड लिटरेचर**
- **चार क्षण**
- **तो आणि ती**
- **प्रियेचे अभंग**
- **देशी दारुचे दुकान-3D**

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

esahity@gmail.com

**नेटाक्षरीचा** हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

netaksharee@gmail.com

आता ई-साहित्यची वरील सर्व ई-प्रकाशन उपलब्ध आहेत सी डी मध्ये “५० रुपयांत १११ ई-पुस्तके”
**संपर्क करा ९८६९६७४८२०**

www.esahity.com